सन २०१७-१८ करिता राज्यस्तरीय अनुसूचित जाती उप योजनेअंतर्गत संरक्षित वनाचे क्षेत्रालगत गावातील अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस, बायो गॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणासाठी प्रोत्साहन देण्याकरिता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१७/प्र.क्र.१००/फ-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- ११ जूलै, २०१७**

वाचा :१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि.१०.०७.२०१२
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.११/१७-१८/४७९, दि.०६.०६.२०१७.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.

प्रस्तावना :-

संरक्षित वनालगतच्या संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या सदस्यांना/ ग्रामस्थांना सवलतीच्या दराने बायोगॅस/ स्वयंपाक गॅस पुरवठा, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणासाठी प्रोत्साहन देण्याबाबतची योजना संदर्भ क्र. १ वरील दि.१०.०७.२०१२ च्या शासन निर्णयान्वये राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. सदरहू योजनेच्या अनुषंगाने सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता अनुसूचित जाती उपयोजने अंतर्गत संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील गावाचे अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस / बायो गॅस पुरवठा करण्याकरिता रु.४०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित केलेला आहे.

३. सन २०१७-१८ करिता सदरहू योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या निधीच्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ वरील दि.०६.०६.२०१७ रोजीच्या पत्रान्वये बांधील कामांकरिता रु.९२९.८६ लक्ष इतक्या रक्कमेच्या मागणीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहेत.

४. त्याअनुषंगाने संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस पुरवठा करणे या योजनेसाठी २४०६ ८१९५ या लेखाशीर्षाअंतर्गत ५०- इतर खर्च या उद्दिष्टाखाली अर्थसंकल्पित निधीच्या मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ वरील दि.०६.०६.२०१७ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव तसेच वित्त विभागाने दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता, संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना एलपीजी कुकींग गॅस, बायो गॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणाकरिता बांधील कामांसाठी **रु.९२९.८६ लक्ष (५० इतर खर्च) इतका निधी** प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्यास व बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील अनुदान खर्च करतांना खालील अटी व शर्ती यांची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी :-

अ) उपरोक्त वितरीत केलेल्या निधीच्या मर्यादेत प्रथम जुन्या लाभार्थ्यांच्या प्रस्तावातील लाभार्थ्यांसाठी अनुदानाचा विनियोग करावा. त्यानंतर, नवीन लाभार्थ्यांच्या प्रस्तावाप्रमाणे नवीन लाभार्थी निश्चित करुन त्यांचेकरिता अनुदानाचा विनियोग करावा.

ब) सदरहू योजनेतील लाभार्थी या विभागाच्या शासन निर्णय क्रमांक, महसूल व वन विभाग क्र.एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि. १०.०७.२०१२, शासन शुध्दीपत्रक क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि.०८.०१.२०१३ व शासन शुध्दीपत्रक क्र.एफडीएम-२०१२/प्र.क्र.२४९/फ-२, दि.०५.०५.२०१४ मधील अटी व शर्तीनुसार असतील याची खात्री करावी.

क) अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांची यादी सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखालील सहायक आयुक्त समाजकल्याण यांच्याकडून प्रमाणित करुन घ्यावी.

ड) सदरहू योजनेतील लाभार्थ्यांनी दिनांक.१०.०७.२०१२ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार एलपीजी कुकींग गॅस साठी व बायो गॅस साठी लाभार्थ्यांचा २५% हिस्सा दिल्याची खात्री करावी.

इ) सदर योजनेअंतर्गत वन विभागाकडून कोणतीही खरेदी करण्यात येणार नाही. ज्या लाभार्थ्यांनी एलपीजी गॅस साठी (२५%) व बायोगॅस साठी (२५%) त्यांचा हिस्सा दिल्यानंतर संबंधित वन विभागाचे उप वनसंरक्षक हे संबंधित योजनेबाबतचे अनुदान संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या बँक खात्यामध्ये टप्प्या टप्प्याने जमा करतील व संयुक्त वन व्यवस्थापन समिती लाभार्थीनिहाय सदरहू रक्कम संबंधित गॅस एजन्सीला देईल.

फ) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्यात येणा-या निधीचा विनियोग त्याच आर्थिक वर्षात होईल व सदर निधी अनुसूचित जातीच्या व नवबौध्द घटकातील लाभार्थ्यांवरच होईल याची दक्षता घ्यावी.

ग) सदर योजनेअंतर्गत मागील वर्षी वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्रत शासनास सादर करावे.

७. उपरोक्त खर्च मागणी क्र.सी-७, प्रधानशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, अनुसूचित जाती उपयोजना, (१४) संरक्षित वनाच्या लगतच्या गावातील अनुसूचित जातीच्या कुटूंबांना कुकींग गॅस व सोलर कुकरचा पुरवठा करणे, (१४) (०१) संरक्षित वनाच्या लगतच्या गावातील अनुसूचित जातीच्या कुटूंबांना कुकींग गॅस व सोलर कुकरचा पुरवठा करणे, ५०-इतर खर्च (२४०६ ८१९५) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३८/विघयो, दि.०६.०७.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१११७२०५०७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Atul Ashok Kode
Date: 2017.07.11 17:18:09 +05'30'

**(श्री.अतुल कोदे)**
सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय मुंबई
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा.नागपूर.
५) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक,
६) सर्व मुख्य वनसंक्षक (प्रादेशिक) / (वन्यजीव)
७) सर्व वनसंरक्षक / सर्व उप वनसंरक्षक (मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) यांचेमार्फत)
८) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
१२) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
१३) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१४) मा.मंत्री (सामाजिक न्याय) /मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव.
१५) सामाजिक न्याय विशेष सहाय्य विभाग,विघयो, मंत्रालय, मुंबई
१६) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२